विद्यमान राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजनेमध्ये औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व आणि नागपूर विभागातील वर्धा या १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्हयांतील शेतकरी कुटुंबांना शाश्वत आरोग्य सेवा पुरविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागांयो-२०१५ / प्र.क्र. २८०/ आरोग्य-६**
जी.टी. रुग्णालय आवार, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: ५ ऑक्टोबर, २०१५

वाचा :-

१) **शासन निर्णय क्रमांकः दाकुआ-२०१०/प्र.क्र.७७/आरोग्य--६, दि. ५ एप्रिल, २०१०**
२) **शासन निर्णय क्रमांकः रागांयो-२०१० / प्र.क्र. २४०/ आरोग्य-६, दि. ३१ मे, २०११**
३) **शासन निर्णय क्रमांकः रागांयो-२०१० / प्र.क्र. २४०/ आरोग्य-६, दि. १६ जुलै, २०११**

प्रस्तावना:-

राज्यात होणाऱ्या शेतकरी आत्महत्यांसंदर्भात झालेल्या चर्चेच्या वेळी आतापर्यंत स्थापन करण्यात आलेल्या समित्यांनी काढलेल्या निष्कर्षानुसार आजारपणामुळे कर्जबाजारी होऊन देखील शेतकरी आत्महत्या करण्यास प्रवृत्त होतो, असे स्पष्ट झालेले आहे. या अनुषंगाने दि. २० जुलै, २०१५ रोजी विधानसभेमध्ये औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व आणि नागपूर विभागातील वर्धा अशा एकूण १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्हयांमधील सर्वच शेतकऱ्यांना शाश्वत आरोग्य सेवा देण्यासाठी मा. मुख्यमंत्री यांनी काही घोषणा केलेल्या आहेत. त्यानुसार कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

औरंगाबाद व अमरावती विभागातील औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद, लातूर, बुलढाणा, अकोला, वाशिम,अमरावती,यवतमाळ आणि नागपूर विभागातील वर्धा अशा एकूण १४ जिल्हयांमधील शेतकरी कुटुंबांना आरोग्य सेवा सहजरित्या उपलब्ध होण्याच्या दृष्टीकोनातून राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी अंगीकृत करण्यात आलेल्या रुग्णालयांची संख्या वाढविण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. तसेच या १४ जिल्ह्यांतील शेतकरी कुटुंबांना योजनेंतर्गत उपचार घेण्याबाबतचे मार्गदर्शन करण्याची तसेच अंगीकृत रुग्णालयांची

माहिती देण्याची जबाबदारी राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत नियुक्त करण्यात आलेल्या आशा स्वयंसेविकेवर सोपविण्यात येत आहे. तसेच या १४ जिल्हयांतील शेतकरी कुटुंबांतील रुग्णांना अंगीकृत रुग्णालयात उपचारासाठी ने-आण करण्यासाठी १०८ या टोल-फ्री क्रमांकावरील रुग्णवाहिकेची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौसं क्र.५२७/व्यय-१३/२०१५,दि. २२ सप्टेंबर, २०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९३०१५०२१९७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tatoba Maruti Kolekar

Digitally signed by Tatoba Maruti Kolekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400001, st=Maharashtra, serialNumber=9915405908628d01955f3675acc122f51e0c39f63f7cc88eec49cd05616991fd, cn=Tatoba Maruti Kolekar
Date: 2015.10.06 11:12:11 +05'30'

**(ता. मा. कोळेकर)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री, आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१०) विभागीय आयुक्त (सर्व)
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना सोसायटी, राज्य कामगार रुग्णालय आवार, वरळी, मुंबई
१२) उप महासंचालक, आधार (यु.आय.डी), टेलिफोन एक्चेंज बिल्डींग, कफ परेड, मुंबई

१३) जिल्हाधिकारी (सर्व)
१४) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१५) संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१६) जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
१७) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
१८) नियंत्रक, शिधावाटप, मुंबई
१९) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२०) सहसंचालक/ उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)
२१) जिल्हा पुरवठा अधिकारी, (सर्व)
२२) जिल्हा माहिती (सर्व)
२३) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकिय महाविद्यालये व रुग्णालये (सर्व)
२४) सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२५) सर्व कार्यासने , सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२६) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, विधानभवन, मुंबई- २१
२७) भारतीय जनता पाटी, महाराष्ट्र प्रदेश सी.डी.ओ. बॅरॅक क्र.१, योगक्षेम समोर, वसंतराव भगवान चौक, नरीमन पाईंट, मुंबई-२०
२८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई- २८
२९) इंडीयन नॅशनल कॉग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई -२५
३०) राष्ट्रवादी कॉग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पाईंट मुंबई- २१
३१) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हठमेंट, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१
३२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी,महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड मुंबई- ४
३३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, मार्क्सवादी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई -१३
३४) निवड नस्ती